श्री धनेश्वरी मानव विकास संस्था, जि.औरंगाबाद संचलित परभणी मेडीकल कॉलेज, मु.पो.पेडगांव, ता.जि.परभणी या वैद्यकीय महाविद्यालयाला सन २०२३-२४ करिता प्रथम बॅच सुरु करण्यास परवानगी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,
शासन निर्णय क्रमांक एमईडी-२०२१/प्र.क्र.२१५/२१/शिक्षण-१,
९वा मजला, गो.ते. रुग्णालय संकुल, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई- ४०० ००१.
दिनांक :- ७ जुलै, २०२३.

**वाचा** :-

१) महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक यांचे पत्र क्र. मआविवि/पीबी/ युजी/पी-१/७०६/२०२०, दि. २९.१२.२०२०.

२) शासनाचे समक्रमांकाचे आवश्यकता प्रमाणपत्र क्र.एमईडी-२०२१/ प्र.क्र.२१५/ २१/शिक्षण-१, दि.२८.०६.२०२२

३) राष्ट्रीय आयुर्विज्ञान आयोग, नवी दिल्ली यांचे क्र. NMC/UG/ २०२३-२४/ ००००५५/०१९५७२, दि. १७.०४.२०२३ चे पत्र.

**प्रस्तावना:-**

श्री धनेश्वरी मानव विकास संस्था, जि.औरंगाबाद संचलित परभणी मेडीकल कॉलेज, मु.पो.पेडगांव, ता.जि.परभणी या वैद्यकीय महाविद्यालयास दिनांक २८.०६.२०२२ रोजी आवश्यकता प्रमाणपत्र देण्यात आले होते. तद्नंतर सदर प्रमाणपत्र व तपासणीच्या अनुषंगाने राष्ट्रीय आयुर्विज्ञान आयोग, नवी दिल्ली यांनी सदर महाविद्यालयासाठी संदर्भ क्रमांक (३) येथील दिनांक १७.०४.२०२३ रोजीच्या पत्रान्वये मान्यता (LoP) प्रदान केली आहे. त्यानुसार संस्थेने वैद्यकीय अभ्यासक्रमाच्या प्रथम वर्षात विद्यार्थी प्रवेशित करण्याकरिता परवानगी देण्याची विनंती शासनास केली आहे. यास्तव सदर संस्थेस शैक्षणिक वर्ष सन २०२३-२४ साठी एम.बी.बी.एस. (वैद्यकीय) अभ्यासक्रमास प्रथम वर्षाकरिता १५० विद्यार्थी प्रवेशित करण्यास परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

श्री धनेश्वरी मानव विकास संस्था, बी-१०१, तुलसी ऑर्केड, कॅनॉट प्लेस, सिडको, जि.औरंगाबाद संचलित परभणी मेडीकल कॉलेज, मु.पो.पेडगांव, पाथरी रोड, ता.जि.परभणी या महाविद्यालयास राष्ट्रीय आयुर्विज्ञान आयोगाने संदर्भ क्रमांक (३) येथील पत्रान्वये शैक्षणिक वर्ष २०२३-२४ साठी १५० विद्यार्थी प्रवेश क्षमतेसाठी मान्यता दिली आहे. त्यानुषंगाने शैक्षणिक वर्ष सन २०२३-२४ साठी एम.बी.बी.एस. अभ्यासक्रमाच्या प्रथम वर्षाकरिता सदर वैद्यकीय महाविद्यालयास १५० विद्यार्थी प्रवेशित करण्यासाठी पुढील अटी व शर्तींच्या अधीन राहून परवानगी देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती:-**

अ. श्री धनेश्वरी मानव विकास संस्था, बी-१०१, तुलसी ऑर्केड, कॅनॉट प्लेस, सिडको, जि.औरंगाबाद संचलित परभणी मेडीकल कॉलेज, मु.पो.पेडगांव, पाथरी रोड, ता.जि.परभणी या वैद्यकीय महाविद्यालयातील विद्यार्थी प्रवेश क्षमता केंद्र शासनाने निर्धारित केल्यानुसार १५० एवढी राहील.

आ. राज्य शासन/केंद्र शासन/मा.सर्वोच्च न्यायालय अथवा मा.उच्च न्यायालय यांनी वेळोवेळी दिलेल्या आदेशानुसार सदर अभ्यासक्रमाच्या प्रवेशाकरिता निश्चित करण्यात आलेली कार्यपध्दती अवलंबिण्यात यावी.

इ. शासकीय नियम / अधिनियमाच्या आधारे तसेच मा.सर्वोच्च न्यायालय व मा.उच्च न्यायालय यांनी वेळोवळी दिलेल्या निर्णयानुसार शैक्षणिक शुल्कासाठी विहित कार्यपध्दतीचा अवलंब करून त्यानुसार शैक्षणिक शुल्क निश्चित करण्यात यावे.

ई. केंद्र शासन, भारतीय आयुर्विज्ञान परिषद, नवी दिल्ली व राज्य शासन यांनी वैद्यकीय अभ्यासक्रमाबाबत वेळोवेळी विहीत केलेल्या नियमांचे व मानकांचे पालन करणे संस्थेवर बंधनकारक राहील.

उ. महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिटयुशन्स (प्रोहिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ (महाराष्ट्र ॲक्ट १९८८ चा ६) मधील तरतुदींचे संस्थेने काटेकोरपणे पालन करणे आवश्यक आहे.

ऊ. सदरहू संस्थेस कायम विना अनुदान तत्वावर मान्यता देण्यात आली आहे. त्यामुळे संस्था आवर्ती/अनावर्ती स्वरुपाच्या खर्चासाठी अनुदानाची मागणी शासनाकडे करणार नाही.

ए. शासकीय वैद्यकीय किंवा तत्सम महाविद्यालयातील कोणत्याही अध्यापकास तो सेवानिवृत्त होईपर्यंत किंवा नियत वयोमानानुसार सेवानिवृत्त होईपर्यंत संस्थेमध्ये नोकरी देता येणार नाही किंवा त्याच्या सेवा संस्थेस वापरता येणार नाहीत.

ऐ. राष्ट्रीय आयुर्विज्ञान आयोग, नवी दिल्ली यांनी परवानगी दिलेल्या विद्यार्थी प्रवेश क्षमतेपेक्षा जास्त विद्यार्थी कोणत्याही परिस्थितीत संस्थेने प्रवेशित करू नये.

ओ. राष्ट्रीय आयुर्विज्ञान आयोगाने दिलेली परवानगी ही सन २०२३-२४ या शैक्षणिक वर्षाकरिता असून तद्नंतर सदर परवानगीचे दरवर्षी नूतनीकरण करुन घेणे क्रमप्राप्त आहे. त्यानुसार पुढील शैक्षणिक वर्षात नव्याने विद्यार्थी प्रवेशित करण्यापूर्वी परवानगीचे नूतनीकरण करुन घेणे बंधनकारक राहील.

औ. गुणवत्तेवर आधारित प्रवेश केलेल्या विद्यार्थ्यांच्या याद्या प्रवेश नियामक प्राधिकरण यांच्याकडून मंजूर करुन घेणे व या अभ्यासक्रमासाठी आकारण्यात येणाऱ्या शुल्काची निश्चिती शुल्क नियामक प्राधिकरणाकडून करुन घेणे, संस्थेसाठी बंधनकारक असेल.

२. सदर शासन निर्णय हा राष्ट्रीय आयुर्विज्ञान आयोग, नवी दिल्ली यांनी संदर्भ क्रमांक (३) येथील पत्रान्वये दिलेली परवानगी तसेच महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ अधिनियम, १९९८ मधील कलम ६४ नुसार शासनास प्रदत्त अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०७०७११२८२५८३१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT TUKARAM SASULKAR

Digitally signed by AJIT TUKARAM SASULKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=09df106c443b4977e7463338fa58f736fdb4fe137863b178345a5ead34dbfb12, pseudonym=8433B0910FFD44AC77C267452786D497C8BC73E0, serialNumber=71214F99804ABAAE1EA28D5F794C1BA337889880D0C567C29D025934340956DF, cn=AJIT TUKARAM SASULKAR
Date: 2023.07.07 19:41:35 +05'30'

(अजित सासुलकर)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राज भवन, मलबार हिल, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. मंत्री (वैद्यकीय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण,मुंबई
५) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
६) कुलसचिव, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक.
७) अधिष्ठाता, सर्व शासकीय वैद्यकीय महाविद्यालये.
८) सचिव, प्रवेश नियामक प्राधिकरण, ९वा मजला, न्यु एक्सेलसिअर बिल्डींग, ए.के. नायक मार्ग, फोर्ट, मुंबई-४००००१.
९) आयुक्त, राज्य सामाईक प्रवेश परीक्षा कक्ष, ८ वा मजला, न्यू एक्सेलसिअर बिल्डींग, ए.के. नायक मार्ग, फोर्ट, मुंबई ४००००१
१०) सचिव, शुल्क नियामक प्राधिकरण, ३ रा मजला, ४९, खेरवाडी, बांद्रा (पू), मुंबई-४०००५१.
११) कक्ष अधिकारी (शिक्षण २), वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) अध्यक्ष, श्री धनेश्वरी मानव विकास संस्था, जि.औरंगाबाद
१३) निवडनस्ती (शिक्षण-१